ई-साहित्य प्रकाशन

# मैफल अक्षरांची

अंक क्र १४ दि २३-२-२००९





कुसुमाग्रज हे मराठी भाषेला पडलेलं एक सुंदर स्वप्न। नाटककार , लेखक वि वा शिरवाडकर आणि कवि कुसुमाग्रज या दोन्ही नात्यांनी त्यांनी महाराष्ट्राला भरभरून दिलं , त्यांचे हे देणं काही आपण फेडू शकत नाही। पण त्यांच्या या आठवड्यात येणा-या जन्मदिनानिमित्त त्यांना हा अंक अर्पण करून वंदन करूया।

### अतिथी संपादकीय-
### डॉ. मुक्ता पाठक-शर्मा



**कुसुमाग्रज** ज्यांच्या नावातच अग्रज आहे असे कवि
मराठी साहित्याला अग्रस्थानी नेऊन ठेवणारे महाकवी २७ फेब्रुवारी १९१२ ला जन्माला आले आणि काकांना दत्तक गेल्यामुळे गजानन रंगनाथ शिरवाडकर, विष्णू वामन शिरवाडकर झाले.
कुसुमाग्रज हे उत्तम कवि तर होतेच पण त्यांचे बहुआयामित्व त्यांच्या उत्कृष्ट नाट्य , ललित लेखन, कथालेखन यातून दृष्टीस येते.

कुसुमाग्रजांच्या कवितेचे सखोल निरिक्षण केले असता असे आढळून येते की त्यांच्या बहुतेक कवितांचा जन्म हा वास्तविकतेच्या जाणिवेतून झाला आहे. मग त्यांची "गर्जा जयजयकार" असो वा "कणा" असो.

त्यांचा साहित्य प्रवास वयाच्या १७ व्या वर्षापासून सुरू झाला . त्यांनी सुरवातीचे लिखाण प्रसिध्द कवि द. न. टिळक यांच्या "बालबोधमेवा" या मासिकातून केले. नंतर रत्नाकर, प्रभा साप्ताहिक, प्रभात वृत्तपत्र, सारथी, धनुर्धारी व नवयुग यामध्येही त्यांचे अनेक ललित, काव्य प्रसिध्दीस आले.
त्यांच्या कवितेतून एक जाज्वल्य क्रांतीकारक / समाजकारक दिसून येतो आणि ह्याचे मुख्य कारण म्हणजे त्यांचा समाजकारणात असलेला सक्रिय सहभाग.
ते अवघ्या २० वर्षाचे असतानाच नाशकातील काळया रामाच्या मंदिरात अस्पृश्यांना प्रवेश मिळण्यासाठी झालेल्या आंदोलनातले ते एक. १९४२ साली त्यांचा पहिला काव्यसंग्रह प्रकाशित झाला "विशाखा" आणि इथूनच ह्या काव्यसूर्याच्या प्रतिभेच्या किरणांनी रसिक मनाला भुरळ पाडली. त्यांनंतर हा सूर्य साहित्य जगतात तळपतच राहिला.
त्यानंतर समिधा, किनारा, मेघदूताचा अनुवाद, मराठी माती, स्वगत, हिमरेषा, वादळवेल, रसयात्रा, छंदोमयी, मुक्तायन, श्रावण, प्रवासपक्षी, पाथेय हे काव्यसंग्रह तर वैष्णव, जान्हवी, कल्पनेच्या तीरावर ह्या कादंब-या आणि फुलवाली, सतारीचे बोल, जादूची होडी, छोटे आणि मोठे, काही वृध्द काही तरूण प्रेम आणि मांजर, कुसुमाग्रजांच्या बारा कथा, अपॉईंटमेंट हे कथा संग्रह . या व्यतरिक्त आहे आणि नाही, विरामचिन्हे, प्रतिसाद, एकाकी तारा,

वाटेवरच्या सावल्या, शेक्सपिरच्या शोधात, रूपरेषा हे मुक्त गद्य ललित निबंध साहित्य. दूरचे दिवे, दुसरा पेशवा, वैजयंती, कौंतेय, राजमुकूट, ऑथेल्लो, आमचे नअव बाबूराव, ययाती आणि देवयानी, वीज म्हणाली धरतीला, बेंकट, नटसम्राट, विदूषक, एक होती वाघीण, आनंद, मुख्यमंत्री, चंद्र जिथे उगवत नाही, महंत, कैकेयी यासारखी नाटके तर दिवाणी खाना, देवाचे घर, नाटक बसते आहे, प्रकाशाची दारे, संघर्ष, बेट यासारख्या नाटिका आणि एकांकिकाही त्यांनी लिहिल्या.

तर "पिंपळपान" या गोविंदाग्रजांच्या समग्र कवितांचे संपादन, बा. भ. बोरकरांच्या "चांदणवेल" या संग्रहाचे संपादन ही त्यांनी केले.

त्यांच्या 'मराठी माती', 'स्वगत' , 'हिमरेषा' या काव्यासंग्रहांना तर 'ययाती आणि देवयानी', 'वीज म्हणाली धरतीला, 'नटसम्राट' या नाटकांना राज्यपुरस्कार मिळाले.

नटसम्राट या नाटकास भारतीय नाट्य अकादमीचा पुरस्कार देऊन गौरविले गेले. ते गोव्याला झालेल्या मराठी सहित्य संमेलनाचे अध्यक्ष होते तर कोल्हापूरला झालेल्या नाट्यपरिषदेचेही अध्यक्षपद त्यांनी भूषविले.
अनेक ठिकाणी अध्यक्षपद, अनेक राज्यसाहित्य, नाट्य, संगित नाट्य पुरस्कारांचे ते मानकरी ठरले.
१९८८ साली त्यांना सर्वोच्च अशा ज्ञानपिठ पुरस्काराने गौरविले गेले.
त्यानंतर त्यांना पद्मभूषणसाठी ही निवडले गेले तेव्हा त्यांनी ते साफ नाकारले.
अशा महान कविच्या कवितांतून वास्तवाबरोबरच दैवत्वाचीही जाणिव होते.

कुसुमाग्रजांच्या कविता जेव्हा मी वाचत जाते तेव्हा एक वेगळाच अनुभव येतो. त्यांची एक नाही तर अनेक कविता मला आवडतात. त्या जीवनात वाटाड्यासारखेच काम करतात.

'पाऊल चिन्हे' या त्यांच्या कवितेत ते सहजपणे रात्रीच्या नक्षत्रांना विचारून जातात आणि त्यांना उत्तर मिळते

***स्मित करून म्हणाल्या मला चांदण्या काही***
***तो मुक्त प्रवासी फिरत सदोदीत राही***
***उठता तमावर त्याची पाऊलचिन्हे***
***त्यानाच पुससि तू आहे की तो नाही***

ऐलतटावर पैलतटावर म्हणणारी त्यांची विराणी असो वा

**प्रेम कर भिल्लासारखं बाणावरती खोचलेलं**
**मातीमध्ये उगवून सुध्दा मेघापर्यंत पोहचलेले**

नाट्यसंवाद पृथ्वीचे प्रेमगीत असो वा कोलंबसाचे गर्वगीत, कुसुमाग्रजांच्या कवितेचा बाज काही और आहे. सगळ्यात मनात घर करून उरणारी त्यांची कविता  म्हजे आम्हाला शाळेत असलेली कुसुमाग्रज लिखित प्रार्थना

**“सर्वात्मका शिवसुंदरा ”**

सर्वात्मका शिवसुंदरा स्विकार या अभिवादना
तिमिरातुनी तेजाकडे प्रभू आमुच्या ने जीवना ।।धृ ।।

सुमनांत तू गगनांत तू
ता-यांमधे फुलतोस तू
सध्दर्म या जगतामध्ये
सर्वात त्या वसतोस तू
चोहिकडे रूपे तुझी जाणिव ही माझ्या मना ।।१।।

श्रमतोस तू शेतांमध्ये
तू राबसी श्रमिकांसवे
जे रंजले वा गांजले
पुसतोस त्यांची आसवे
स्वार्थाविना सेवा जिथे तेथे तुझे पद पावना ।।२।।

करूणाकरा करूणा तुझी
असता मला भय कोठले ?
मार्गावरी पुढती सदा
पाहिन मी तव पाऊले
सृजनत्व या हृदयामध्ये नित जागवी भितीविना ।।३।।
**- कुसुमाग्रज**

संपादकीय

- *नाम गुम जायेगा*
**( यजमान संपादक )**

गेल्या शुक्रवारी मी आणि आनंदा मंगेश पाडगांवकरांना भेटलो। तेव्हा त्यांनी सांगितलेल्या कुसुमाग्रजांच्या आठवणी त्यांच्याच शब्दांत

"मी ४२ साली शाळेत असताना विशाखा प्रसिद्ध झाला. त्याने तर मला वेडच लावले. पहिल्या कवितेच्या पहिल्या ओळीपासून ते "समिधाच सख्या या" पर्यंत सगळं पुस्तक तोंडपाठ झालं. तेव्हा वा ल कुलकर्णी हे आमचे मराठीचे शिक्षक। त्यांना गळ घातली. या कवीला आपल्या शाळेच्या संमेलनाला बोलवायचं। पण वा ल म्हणाले . हा कुठे जात येत नाही. पण मी बोलून बघतो. वा ल नाशिकचेच, त्यांनी शब्द टाकला आणि कुसुमाग्रज यायला तयार झाले. तेव्हा बरं का मुंबईत घोड्याच्या गाड्या होत्या. मी हट्ट धरला, कुसुमाग्रजांना आणायला मी जाणार. आणि त्यांना घोडा गाडीतून घेऊन आलो. संपूर्ण प्रवासात , एखादं मूल जसं आईला चिकटून असतं तसा मी त्यांना चिकटून बसलो होतो.

पुढे आमची खुप मैत्री झाली।" इति **मंगेश पाडगावकर**



मिसळपाव अक्षरा

# विरह

पूनवेला तडागी फुलले पद्म कमळांचे कळे!
आज आकाशी पुन्हः उगवले नक्षत्रांचे मळे

रान जळाले, पेटला वणवा, तव स्मृतींचा
धावत सुटलो, पदर उलगडीत मी काळाचा

नाजूक पावले तुझी उमटली माझ्या हृदयावरी
दूर दूर, सूर पूर, पुन्हा उमलवली मंद  पावरी

सखे! मिटवूनी ये, आता त्या विरह कळयांना
कायमचे मालवूनी टाक तू ग़तकाळ कलांना

आर्तते बोलाविते माझी ही सुरेल पावरी
ये ना ग प्रिये लगबगे माझे साजण बावरी

लागतील चंद्रझळा प्रिये तुझ्या गालांना
पदर ओढून हळूच ये विरल्या वाटांना

गुंफून टाकू चंद्रकलांना, बांधू यमुनेवरी झुला
नक्षत्रांची एक चांदणी करूनी देईन तुला

नयनी तुझ्या पेरेन मी लाख सुरांचे थवे
मंजुळ गान गातच राहू रोज नव नवे

**- डॉ. मुक्ता पाठक - शर्मा**

## त्या पल्याड

वारू तो अबलख़ चौफ़ेर स्वैर संचारे
घासून खुर फुरफ़ुरुन रोज विचारे
..."त्या पल्याड तिथल्या ह्याच तळयाच्या काठी
आपल्यासम भासे कोण तयांच्या पाठी" ...

दूरून तयांचे छतही प्रशस्त वाटे
ऐटीत दौडती एक हाकऱ्या साथे
सामर्थ्य काय अन कसे ध्वनी टापांत
दश प्रयास करता अपुला एक आघात

भरधाव वेगती पुन्हा त्याच ऐटात
अडवाच कुणी ना तमा... उसळी वेगात
तो पाठीवरचा गुलाम (?) ऐट ती राख़ी
स्वैर धावण्या अन फ़क्त उसळण्या साठी ?

चिरून तळे भरधाव पल्याड त्या जावे
प्रशस्त छताच्या खाली थाटात रहावे
आभुषणांनी पाठीच्या वस्त्रांकित व्हावे
तो थाट, चाल ती, ऐट दिमाख पहावे

जाताच घातले लोहबंध त्या पायी
अर्पिले स्वतःहून स्वातंत्र्य तयांच्या ठायी
कसले छत अन काय खालची जागा
स्तब्ध रहाण्या तो तर किंचित पागा

रुतवली तयांनी निर्दयतेने नाल
जो ध्वनी ऐकूनी धरिला हेवा काल
किती प्रयासे आवाज जेव्हा एका
त्या खुरांना अता तोच तो ठेका

आसुडे फ़टके ऐटीत दौडण्यासाठी
मुद्दाम रोखती मध्येच उसळण्यासाठी
सटकारे किती आसूडे तयांच्या पाठी
स्वैर धावण्या अन फ़क्त उसळण्या साठी ?

काय टाप अन दौड कुणाच्या साठी ?
कोण गुलाम अन आसूड कुणाच्या हाती ?
त्या पल्याड तिथल्या ह्याच तळयाच्या काठी
आपल्यासम भासे ना कुणी तयांच्या पाठी ...

**-प्राजक्त देशमुख (नाशिक)**

# राधा मी

राधा मी , सखी मी, प्राप्ती मी मोक्षाची
राधा मी, भक्ति मी, शक्ति मी कृष्णाची

चंद्रमुखी मी, पौर्णिमा , चकोर चकित सुनयना मी
अमृते मुखकमल धुवूनी दशदिशा उजळिते मी
राधा मी

दामिनी मी, चपला, चक्रधारीस आव्हान मी
रागे भरता दिनकरावर , ब्रह्माची नवसृष्टी मी
राधा मी

रासेश्वरी मी, सुंदरा , रसिक शिरोमणीची रति मी
उत्कट, निर्मल, आत्मिक प्रेमाची व्याख्या मी
राधा मी

वियोगिनी मी, विरहा, पुरुषोत्तमाची पूजक मी
दिली मुरली बन्सीधराने जीस, ती भाग्यश्री मी
राधा मी

प्रिया मी, अमरा, जगन्नाथ तो वैश्विक , अणू मी
देहोत्सर्गी कृष्ण हृदयी विराजित एकमेव कृष्णा मी

राधा मी , सखी मी, प्राप्ती मी मोक्षाची
राधा मी, भक्ति मी, शक्ति मी कृष्णाची
राधा मी

**- स्वप्ना कोल्हे ( नाशिक)**

## कसमसे माल एकदम भरेली है

पुर्वी कीती छान असायचं
आमचं मैत्रिणींचं टोळकं जमायचं
सासूच्या तक्रारी, नवऱ्याच्या कटकटी
सगळं ऐकमेकांत वाटायचं

आता सगळं ओनलाईन असतं
निरोपांसाठी स्क्रॅपबुक असतं
दोस्ती करायला इन्विटेशन लागतं
कौतुक करायचं तर टेस्टीमोनियल लिहायचं

प्रोफ़ाईल विजिटरच्या प्रोफ़ाईलमध्ये
सहज उत्सुकता म्हणून डोकावले
गंमत म्हणून त्याचे स्क्रॅपसुद्धा वाचले
किळसवाणी चर्चा पाहून मात्र पस्तावले

'अपने एरियामें नयी रांड आयेली है
तू जायेगा क्या , मैने ट्राय कियेली है
थोबडा कुछ खास नहीं पर
माल एकदम भरेली है'

बाविस वर्षाच्या पोराचे शब्द ऐकून
पाय लटपटले डोकं भणभणलं
आयुष्यात पहिल्यांदाच
माझ्यातलं स्त्रीपण शरमलं

वाटलं द्यावं ठासून उत्तर
कॉलर पकडून विचारावं
का रे बाबा . . .जिथून जन्मलास
तिथेच का बरं थुंकलास

बलात्कार होतो ती नासलेली
घट्स्फ़ोट होतो ती वाईट चालीची
दिलखुलास वागते ती चालू
थारा देत नाही ती आगाऊ

सगळं तुम्हीच ठरवायचं
मन मानेल तसं भोगायचं
फ़ुल म्हणून कुरवाळायचं
कंटाळा आला की तुडवायचं

मी देवाला सांगणार आहे
पुढच्या जन्मी एक उपकार कर
मला स्त्रीचा जन्म दे पण
ह्या वासनांध पुरुषांना रांड कर

कळू देत त्याना सर्व वेदना
लागू देत ते किळसवाणे आजार
वाहू देत रक्त त्यांचं
दिसणारं अन आतल्या आत वाहणारं

निर्मिती क्षमतेच्या सत्कारासाठी
श्रीकृष्णाने डोक्यावर मिरवलेलं मोरपीस
तुम्हाला काय कळणार भडव्यांनो
त्यासाठी स्त्रीच्या जन्मी यावं लागेल

**स्नेहा पाटील ( मुंबई, नाशिक)**

शब्दअक्षरी

## चिमणी

एका वर्तुळात कुंकू भरुन
त्यांनी त्यावर
तेवती पणती ठेवली

आयुष्यभर तुला
ओळख न देणा-यांनी
मरणानंतर
तुझी ओळख शोधायचा प्रयत्न केला !

रात्रभर पणती जळली
हवेत वर्तुळे हलली
सकाळी कोणीतरी किंचाळले
"अरे ! चिमणीची पाऊले !!"

मी म्हणालो,
"आता तरी तुला ओळख मिळली ?
घरटे बांधशील?"

तुझी  चिमणी झाली ग चिमणी

**-विश्वजीत महाजन**

## अंतरंग

जपावी प्रत्येकानं
आपल्या अंतरंगात
एक वेदना !
अन नाकारावं
आपलच अस्तित्व....

विरहाच्या निमित्ताने का होईना
तळहातावर ठेवून निखारे,
द्यावं नशिब पेटवून !
आपल्याच पायांनी टाकाव्यात
सा-या वाटा लाथाडून !

भविष्यकाळाचे पार
गाडून टाकावेत बेत.
स्वतःलाच समजावं
एक चालतं बोलतं प्रेत.

मग बघ मित्रा !
कसं मस्तपैकी जगता येतं !
अन आयुष्याच अवघड कोडं
आपोआप उलगडत जातं ..

**-भूपेश कुंभार**

## श्वास

मळकटलेल्या दिशांतून चाले
मळकटलेल्या मेघांचा थवा
उदास मळकट सुरात गातो
जसा कुठे पारवा

भिजला दिनांत संथ जांभळा
नदीतीरावर सांज ढळे
जसा कुठे चंद्र अमेचा
नयनामधून झरझर गळे

विहंगमाला आकाशातून
कुणीकडे परतल्या
गर्द सावळ्या झाडांच्या
नजरा बुंध्याशी रुजल्या

हे आर्त कुणाचे सूर सांडले
आसमंत विरघळला
स्वप्न बिलगले पुन्हा दिठीला
श्वास जरासा ढळला

- **सुरुची नाईक**

## एक अर्घ्य

एक अर्घ्य
त्या अंतःस्थ प्रकाशाला,
ज्याने मोहाच्या सर्वात उंच लाटेवर आरुढ असतांनाही
सोडले नाही विवेकाचे लगाम

एक अर्घ्य
त्या अबोध अव्यक्ताला,
ज्याच्या अनाहत , चिरंतन ध्वनींनी
नादावून राहिला मनाचा गाभारा !

एक अर्घ्य
त्या अद्‌भुत लावण्याला,
जे प्रस्फुटित होत राहिलं

सृष्टीतील प्रत्येक नविन जन्माबरोबर
कोवळ्या सुकुमार पालवी प्रमाणे !

एक अर्घ्य
त्या सर्वव्यापी आनंदाला,
ज्याने उजळून टाकला प्रत्येक मनाचा कानाकोपरा ,
आणि दिले प्रत्येक शुद्ध वेदनेला
निर्मितीचे वरदान !

**-आसावरी गुपचुप**

## अवचित यावे असे कुणीतरी

अवचित यावे असे कुणीतरी,
आणि सरावी एकल वाट,
संगे संगे चालत असता,
हळूच घ्यावा हाती हात.

त्यास्पर्शाने पुलकित व्हावे
आणि सुचावी अनवट तान
गर्भरेशमी सरगम लेऊन
कंठी यावे नअजूक गान

त्या गाण्याने झंकृत व्हावी
मनविणेची अबोल तार
आणि चढावा सर्वांगावर
सुवर्णपंखी अनुपम साज

**- श्रीपाद कोठे**

## मीलनाचे

उघडावे दार
नयनांच्या पार
सोबती अपार
मीलनाचे !

स्पर्शाला भिवून
लाजते वळून
मिठीत गोडवे
मीलनाचे !

लागेल चाहूल
बासरीची हूल
तुझ्या ओठी फूल
मीलनाचे !

असेल नसेल
रातही फसेल
स्पर्श आता झेल
मीलनाचे !

व्योमास कळेल
अशी घालमेल
गाणेही लाजेल
मीलनाचे !

**- वर्षा पाटील**

## कागदी शिक्षा

कड्यावरून लोटलेली
भावमूलक अक्षरे
कोरडी होती की होती ओली
पसार महदंतरे !

ओलेत्या त्या भावनांना
कोरडी कागदी शिक्षा
पुसली जरी गेलेली
कोण घालील भिक्षा !

मातबरी ती शब्दांची
जपून ठेवा अक्षरांना
पायमल्ली हो जरीही
सांडून जाता भावना !

**- सुरेश पेठे**

## खोल आत कुठेतरी सलतं रे

वर सार आलबेल
जिवाची घालमेल
खोल आत कुठेतरी सलतं रे
खोल आत कुठेतरी सलतं रे

लागे मना हूरहूर
सावरला जरी पूर
ओल येता कूठेतरी जळतं रे
खोल आत कुठेतरी सलतं रे

सांज गेली दटावून
निशिगंधा साठवून
जिव्हाळयाचं काळजात उलतं रे
खोल आत कुठेतरी सलतं रे

सारं काही पारिजात
केशरल्या वसनात
मोह-माया सार काही कळतं रे
खोल आत कुठेतरी सलतं रे

**दीपा कुलकर्णी - मिट्टीमणी**

## नव्या मनूचे स्वप्न

जग थोडेसे बदलले तरी काही बिघडले नाही
नव्या मनूचे स्वप्न पहाणे आम्ही सोडले नाही!

कोण कळेना आपुला-दुजा, जग हे स्वार्थी बनले;
पाश रेशमी तरी प्रेमाचे आम्ही तोडले नाही !

आज घराचे वासे आमुच्या का न कळे हे फिरले;
वैफल्याने ग्रासूनी घरटे आम्ही मोडले नाही !

माणूसकीचा -हास आमुच्या हळूहळू होताना;
खापर त्याचे दुजा शिरावर आम्ही फोडले नाही !

दोष जयांचा आहे त्यांच्या पदरी टाकले माप;
साप सोडूनी भुईस कधीही आम्ही  झोडले नाही !

दोष आमुचा दाखविणारे कुणी भेटले मार्गी;
त्यांचे म्हणणे अट्टाहासे आम्ही खोडले नाही !

विज्ञानाचा वर मनुजाला शाप भासतो आहे;
त्याचे नाते संहाराशी आम्ही जोडले नाही !

जग थोडेसे बदलले तरी बिघडले नाहीः
नव्या मनूचे स्वप्न पहाणे आम्ही सोडले नाही!

**- कर्नल अशोक सायनाकर**

# नेटाक्षरी

जगभरच्या इंटरनेटवरील साहित्यिकांतिल एक सुपरिचित नाव म्हणजे डॉ मुक्ता पाठक शर्मा . व्यवसायाने पशुवैद्य असल्या तरी त्यांचा पिंड साहित्यिकाचा. आणि वास्तव्य सिंगापुरात असलं तरी मनाचा मुक्काम नाशिकमधेच .

बालपणापासून लेखनाचा छंद त्यात अनेक मोठ्या कविंचा सहवास लाभलेला. नाशिकची साहित्यसुपिक भुमी. या सर्वांमुळे शब्दांवर साहित्यावर अतोनात प्रेम. मोठेपणीही जेव्हा सिंगापूरसारख्या परभाषिक प्रदेशात वास्तव्याची वेळ आली तेव्हा मनाची तडफ़ड झालीच . पण इंटरनेटच्या माध्यमाचा त्यांनी अत्यंत कल्पकतेने उपयोग करून साहित्यसेवा चालू ठेवली आहे. स्वतः कविता व गद्य लेखन तर त्या करतातच. पण अनेक नवीन कवि लेखकांना मदत व मार्गदर्शन त्या करत असतात.



त्यांचे मराठी भाषेच्या अलंकरणाविषयीचे अनेक लेख़ इंटरनेटवर प्रसिद्ध झाले आहेत. वृत्त, छंद, गझल, अनेक जुन्या कविंच्या कविता आदि विषयांवर त्या सातत्यपूर्ण आणि अभ्यासू लिखाण करत असतात. इंटरनेट वरील कविंचा ऑडवाटेच्या कविता या संग्रहाचं संपादन त्यांनी केलं आहे. त्यांचे स्वतःचे ललित साहित्य लिखाण भावपुर्ण व सांदर्यपूर्ण असते. त्यांचा एक मोठा चाहतावर्ग आज महाराष्ट्रात व जगभरात आहे अशा विदुषीचा आज आम्हाला अतिथी संपादक म्हणून लाभ होत आहे याचा सर्वांना आनंद आहे.

नेटाक्षरी हा अंक विनामूल्य वितरीत केला जातो
आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .
netaksharee@gmail.com